राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम व दृष्टी क्षीणता कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ करीता आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्रीच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-०९१८/प्र.क्र.४५४/आ -७
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/अंनिका/प्रशासकीय मान्यता/१४८१-८२/१८, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८.

प्रस्तावना :-

केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय अंधत्व व दृष्टी क्षीणता नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ मध्ये प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात मान्यता दिल्याप्रमाणे आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांच्या संदर्भीय दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय अंधत्व व दृष्टी क्षीणता नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ मध्ये प्रकल्प अंमलबजावणी आराखड्याला मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुषंगाने सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांच्या कार्यक्षेत्रात आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्री उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सन २०१८-१९ मध्ये FMR Code ६.१.१.१.९.a जिल्हा सबळीकरणी सहाय्यक

अनुदानानुसार आवश्यक असणारी रु.५८४.५० लक्ष इतक्या रकमेच्या औषधे व साहित्य सामुग्रीच्या खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. No. | Equipment | Qty | Rate per unit ( Rs. In Lakhs) | Amt in lakhs |
|---|---|---|---|---|
| 1 | Microscope | 20 | 15.00 | 300 |
| 2 | A-scan | 20 | 2.00 | 40 |
| 3 | Slit lamp | 20 | 1.25 | 25 |
| 4 | Keratometer | 20 | 0.45 | 9 |
| 5 | Catract set | 845 | 0.11 | 93 |
| 6 | Flash Autoclave | 5 | 3 | 15 |
| 7 | Indirect Ophthalmoscope | 2 | 0.50 | 1.00 |
| 8 | Fundus Camera with Computer, Screen and Monitor | 1 | 35.00 | 35.00 |
| 9 | Argon laser with 5 Step slit lamp | 1 | 35.00 | 35.00 |
| 10 | Non-Contact tonometer | 2 | 5.00 | 10.00 |
| 11 | Fundus camera with laptop | 1 | 5.00 | 5.00 |
| 12 | Indirect Ophthalmoscope | 1 | 1.50 | 1.50 |
| 13 | Fundus camera with laptop | 1 | 5.00 | 5.00 |
| 14 | Fundus camera with laptop | 1 | 5.00 | 5.00 |
| 15 | Fundus camera with laptop | 1 | 5.00 | 5.00 |
| **Total** | | | | **584.50** |

३. सदरची प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर अंधत्व व दृष्टी क्षीणता रुग्णांना आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्री यांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्याची जबाबदारी प्रकल्प संचालाकंची असेल. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू अंधत्व व दृष्टी क्षीणता रुग्णांना आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्री यांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४)	प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५)	खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६)	खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७)	सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च FMR Code ६.१.१.१.९.a Grant in aid for strengthening of Dist. नुसार अंधत्व व दृष्टी क्षीणता रुग्णांना आवश्यक असणारी औषधे व साहित्य सामुग्री खरेदीकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८)	तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९)	संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०)	शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११)	खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१२)	प्रस्तुत प्रकरणी किती निधीची खरेदी करण्यात आली व संबंधीत एपकरणे कोणत्या जिल्ह्यांना व किती पुरवठा करण्यात आला, याची माहिती शासनास सादर करण्यात यावी.

४.	उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१५२९५०४०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.11.26 12:02:19 +05'30'

**(सु. अ. पेडगांवकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत :-

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२)अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
४) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
५) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
६) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
७) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
८) निवडनस्ती (आरोग्य-७)